नामवंत उर्दू लेखक व कवी यांच्या पुस्तकांची वर्गवारी निश्चिती व पारितोषिकाची रक्कम तसेच परिक्षकांच्या मानधनाच्या रकमेत वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उसाअ-२०१५/प्र.क्र.३/का.४**
मादामा कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १२ ऑगस्ट, २०१५

**वाचा**

१) सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः क्र.इयुए-१०७५/एल-जेजे, दि.१६.४.१९७५
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सास्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः उपूयो-२००२/प्र.क्र.३६/सां.का.५, दि.२२/११/२००२.
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः उसाअ-२०१०/प्र.क्र.०२/१०का.६, दि.१२/३/२०१०२०१०.
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः उसाअ-२०१०/प्र.क्र.०९/१०का.६, दि.२३/२/२०११.
५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः उसाअ-२०१३/प्र.क्र.३५/उसाअ, का.६, दि.३१/१०/२०१४.

**प्रस्तावना**

वरील संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या आस्थापनेची उद्दिष्टये नमूद करण्यात आलेली असून सदर उद्दीष्टांपैकी एक उदिष्ट हे “उर्दू पुस्तकांना पारितोषिक देणे” असे आहे. सदर उद्दिष्टास अनुसरुन प्रत्येक वर्षी (कॅलेंडर वर्ष) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत उर्दू वर्तमानपत्रात जाहिरात देवून उर्दू भाषेच्या कवी/लेखकांकडून त्या त्या वर्षात प्रकाशित उर्दू भाषेतील पुस्तके मागविण्यात येतात. अशा प्रकारे प्राप्त झालेल्या पुस्तकांची उर्दू भाषेचे नामवंत कवी/लेखक/विचारवंत तज्ज्ञांकडून छाननी/पडताळणी करुन पात्र पुस्तकांना संबंधित वर्षाकरिता पारितोषिके (ठोक रक्कम, स्मृतिचिन्ह व शाल) देण्यात येतात. या पार्श्वभूमीवर पारितोषिक प्रदान करण्याकरिता पुस्तकांची वर्गवारी निश्चित करणे, परिक्षकांचे मानधन व पारितोषिकांची रक्कम निश्चित करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत उर्दू भाषेच्या विकासासाठी राबविण्यात येणाऱ्या “उर्दू पुस्तकांना पारितोषिक देणे” या योजनेनुसार, उर्दू भाषेतील लेखक/कवी/विचारवंत यांच्या दरवर्षी जानेवारी ते डिसेंबर (कॅलेंडर वर्ष) या कालावधीत प्रकाशित झालेल्या पुस्तकांमधून पात्र पुस्तकांची

पारितोषिकांसाठी निवड करण्याकरिता पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पुस्तकाची वर्गवारी, प्रत्येक वर्गवारिकरिता नियुक्त करावयाच्या परिक्षकांची संख्या, प्रत्येक वर्गवारीमधून द्यावयाच्या पारितोषिकांची कमाल संख्या निश्चित करण्याचा, पारितोषिकांच्या ठोक रक्कमेत रु.१०,०००/- वरुन १५,०००/- अशी वाढ करण्याचा, तसेच परिक्षकांना द्यावयाच्या मानधनात रु.२,५००/- व रु.५,०००/- वरुन ठोक मानधन रु.१०,०००/- (यामध्ये प्रवासखर्च तसेच राहण्याचा व जेवणाचा खर्च समाविष्ट ) करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | वर्गवारी | प्रत्येक वर्गवारीसाठी नियुक्त करावयाच्या परिक्षकांची संख्या | रकाना क्र.२ मधे नमूद वर्गवारीतून द्यावयाच्य पारितोषिकांची कमाल संख्या | पारितोषिकासाठी पात्र पुस्तकांना द्यावयाची ठोक रक्कम (प्रत्येकी रुपये) | परिक्षकांचे मानधन, प्रवास खर्च व राहण्याचा व जेवणाच्या खर्चाचा समावेश आहे. (प्रत्येकी रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | टिकात्मक/संशोधन/ऐतिहासिक | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |
| २ | आत्मचरित्र/प्रवासवर्णन/विज्ञान/तांत्रिक | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |
| ३ | कथा/कादंबरी/नाटय लेखन/इतर | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |
| ४ | काव्यसंग्रह | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |
| ५ | हास्यव्यंग/विनोदी लेखक | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |
| ६ | अनुवाद/निबंध/अफसाना/संग्रह | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |
| ७ | बाल-साहित्य | ३ | ३ | १५,०००/- | १०,०००/- |

२. योजनेंतर्गत पारितोषिके प्राप्त करण्यासाठी पुस्तके पाठविण्याविषयीच्या प्राथमिक अटी, शर्ती आणि कार्यपध्दती सोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या असून या योजनेत सहभागी होऊ इच्छिणाऱ्या सर्व लेखक/कवी/विचारवंत यांनी या अटी, शर्ती व कार्यपध्दतीचे अवलंब करणे बंधनकारक राहील व अन्यथा त्यांच्या पुस्तकांना या योजनेत समाविष्ट केले जाणार नाही.

३. या योजनेवर तसेच पारितोषिक वितरण कार्यक्रम आयोजित करण्यासाठी येणारा खर्च हा शासनाकडून महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीला त्या त्या वर्षी मंजूर व वितरीत करण्यात आलेल्या सहायक अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश कॅलेंडर वर्ष २०१४ (दि.१ जानेवारी, २०१४ ते दि.३१ जानेवारी, २०१४) पासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू होतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mdd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१२११४३२२९९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2015.08.14 12:55:54 +05'30'

( अनिस शेख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख कार्यासनामार्फत)
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४. प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सहसचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग (का-७)
७. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग (का-२)
८. कक्ष अधिकारी, रोख कार्यासन, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (४ प्रती)
९. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
१०. कक्ष अधिकारी (का-४), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती (का.४)

# परिशिष्ट “अ”

**अटी व शर्ती :-**

१. वाङ:मयीन पुरस्कारासाठी उर्दू वर्तमानपत्राद्वारे जानेवारी ते डिसेंबरच्या कालावधीत प्रसिध्द झालेल्या मूळ साहित्य कृती, अनुवादित व एखाद्या साहित्यावर आधारित, शिक्षण, तंत्रज्ञान व संशोधनपर साहित्य कृती, पुरस्कारासाठी विचारात घेतल्या जातील. मात्र डॉक्टरेटसाठी (पी.एच.डी.) प्रसिध्द केलेले निबंध/साहित्य/पुस्तके वाङ्:मय पुरस्कारासाठी विचारात घेतली जाणार नाहीत, अर्थात अशा पुस्तकांना पुरस्कार दिले जात नाहीत.

२. वाङ्:मय पुरस्कारासाठी लेखक/कवी हा महाराष्ट्र राज्यात स्थायी अधिवासी (डोमेसाईल इन महाराष्ट्र) असावा. अर्थात महाराष्ट्रात किमान १५ वर्ष निवास असणे आवश्यक आहे.

३. वाङ:मय पुरस्कारासाठी गतवर्षातील जानेवारी ते डिसेंबर या कालावधीत प्रसिध्द झालेल्या व प्रथम आवृत्ती असलेल्या साहित्य कृती पात्र असतील.

४. वाङ:मय पुरस्कारासाठी हस्तलिखित किंवा टंकलिखित स्वरुपातील साहित्य कृती विचारात घेतल्या जाणार नाहीत.

५. पुरस्कारासाठी विहित नमुन्यातील अर्ज सहा प्रतीसह वर्तमानपत्रात प्रसिध्द केलेल्या अंतिम दिनांकापासून विचारात घेतल्या जातील. त्यानंतर अकादमी कार्यालयात प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. अथवा या अर्जासोबत प्राप्त झालेली पुस्तके लेखकास परत केली जाणार नाही.

६. विहीत अर्जासोबत लेखक/कवीने प्रकाशित केलेली साहित्य कृती ही मुळ साहित्य कृती किंवा हे अनुवादित साहित्य असून अनुवादासाठी मुळ लेखकाची अनुमती मिळविल्याच्या परवानगी पत्राची प्रमाणित प्रत पाठविणे आवश्यक आहे.

७. साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळालेली साहित्य कृती किंवा ज्या साहित्य कृतीस अकादमीने किंवा साहित्य अकादमीने पुरस्कार दिला आहे, अशा साहित्य कृतीमधील काही मजकूर समाविष्ट केलेल्या साहित्य कृती उर्दू अकादमीच्या वाङ:मय पुरस्कारासाठी विचारात घेतल्या जाणार नाहीत.

८. ज्या साहित्यिकांना/ले-आऊट डिझायनरला २ वर्ष आधी पुरस्कार मिळाला आहे त्याचा चालू वर्षाच्या पुरस्कार योजनेत विचार केला जाणार नाही. तसेच या वर्षात पुरस्कार मिळालेल्या व्यक्तिंचा पुढील २ वर्षासाठी विचार केला जाणार नाही.

९. साहित्य कृतीचे एकापेक्षा अधिक लेखक असतील तर सर्व सह लेखकाची अथवा एका सहलेखकास यापूर्वी वरील अट क्रमांक ८ लागू होत असेल तर अशी साहित्य कृती पुरस्कारासाठी विचारात घेतली जाणार नाही.

१०. दिवंगत लेखकाची साहित्य कृती स्पर्धेसाठी विचारात घेतली जाणार नाही.

११. आत्मचरित्रपर साहित्य कृती संबंधित लेखन स्वतंत्र आहे अथवा ज्याच्या चारित्र्यावर आधारित कृती आहे, अशा लेखकाने अथवा तयाच्या नातेवाईकांनी लेखी अनुमती दिल्यास अशी साहित्य कृती पुरस्कारासाठी विचारात घेतली जाईल.

१२. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीवर अथवा उर्दू साहित्य अकामदीच्या पुरस्कार समितीच्या सदस्यावर कोणत्याही प्रकारे दबाव आणणारी व्यक्ती उर्दू साहित्य अकादमीतर्फे दिल्या जाणाऱ्या कोणत्याही पुरस्कारासाठी अपात्र ठरेल. तसेच अशा व्यक्ती पुढे कधीही पुरस्कारासाठी पात्र राहणार नाही.

-=oooOOOOooo=-